भूतपूर्व संस्थानामधून सेवा निवृत्त झालेल्या कर्मचा-यांस निवृत्तीवेतन व मृत्यू पावलेल्या कर्मचा-यांच्या विधवा पत्नी / विधूर यांना कुटुंब निवृत्तीवेतन मंजूर करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग,**
**शासन निर्णय क्रमांक :- पीपीएन-१०९४/प्र.क्र.१३२/पंचवीस,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक :- १ सप्टेंबर, १९९९.**

पहा :- १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक पीईएन-१४७२/ ४६८/७२/ एस-२, दिनाक २१ जुलै, १९७३.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक कुनिवे-१०८५/११८९/सेवा-८, दिनाक २० जून, १९८६.
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक पीपीएन-१०९४/ प्र.क्र.१३२/ पंचवीस, दिनांक १० जानेवारी, १९९६.

**प्रस्तावना :-** शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक पीपीएन-१०९४ / प्र.क्र.१३२ / पंचवीस, दिनांक १० जानेवारी, १९९६ अन्वये भूतपूर्व संस्थानातील प्रशासकीय सेवेतील कर्मचा-यांप्रमाणे खाजगी / खानगी कर्मचा-यांनादेखील निवृत्ती वेतन तसेच भूतपूर्व संस्थानातून सेवानिवृत्त झालेल्या किंवा सेवानिवृत्तीनंतर मृत्यू पावलेल्या प्रशासकीय / खासगी / खानगी कर्मचा-यांच्या विधवा विधुरांना कुटुंब निवृत्तीवेतन मंजूर करण्याचे आदेश काढण्यात आले आहेत. सदरहू आदेशांच्या दिनांकानंतर असे निवृत्तीवेतन कुटुंब निवृत्तीवेतन मंजूरी बाबतच्या विहित "ब" नमुन्यातील अर्जावर संबंधित जिल्हाधिका-यांनी त्यांचे स्तरावर निर्णय घ्यावा असेही स्पष्ट करण्यात आले आहे. तथापि त्यानंतर सदरहू आदेशांची अंमलबजावणी करतांना उपस्थित झालेल्या त्रुटी / अडचणी जिल्हाधिका-यांनी शासनाच्या स्तरावर सादर केल्या. निवृत्तीवेतन / कुटुंब निवृत्तीवेतन मंजूर करतांना संबंधित कर्मचा-यांची किती वर्षांची सेवा ग्राहय धरावी याबाबत, तसेच कोणते पुरावे ग्राहय धरावे याबाबत निश्चित आदेश सदर शासन निर्णयात नव्हते. त्यावर शासनाने सखोल विचार करून खालील निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

अ) भूतपूर्व संस्थातील कर्मचा-यांना दिनांक १०/०१/१९९६ च्या शासन निर्णयातील तरतूदी नुसार निवृत्तीवेतन व मृत्यू पावलेल्या कर्मचा-यांच्या विधवा पत्नी / विधुर यांना कुटुंब निवृत्तीवेतन मंजूर करावयाचे झाल्यास या कर्मचा-यांचा सेवा कालावधी कमीत कमी किती असावा या मुद्यासंदर्भात असे स्पष्ट करण्यात येते की, भूतपूर्व संस्थानातील कर्मचा-यांनी संस्थाने विलिन झाली त्यावेळी म्हणजे सन १९५० मध्ये त्यांची किमान दहा वर्षे सेवा झाल्याचा व कोणत्यातरी एका पदावर सेवेत कायम असल्याचा पुरावा सादर केल्यास त्यांना यथास्थिती सुधारीत निवृत्तीवेतन नियम १९५० व विद्यमान महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन) नियम, १९८२ नुसार निवृत्तीवेतन कुटुंब निवृत्तीवेतन अनुज्ञेय होईल.

ब) उपरोक्त दिनांक १० जानेवारी १९९६ च्या शासन निर्णयाच्या प्रयोजनार्थ कोणता पुरावा ग्राहय धरावा या मुद्यासंदर्भात असे स्पष्ट करण्यात येते की, काही प्रकरणी तात्पुरते नेमलेल्या कर्मचा-यांकडून आवक जावक बारनीशी मधील नोंदीचा उतारा ( उदा.

GR - 20020418125007000 - 0100

किरकोळ रजा, बदली, कार्यमुक्ती ) पुरावा म्हणून सादर केला जातो, तसेच भूतपूर्व संस्थानात युनिफॉर्म घालून पोलीस ड्रायव्हर, क्लिनर, कंडक्टर, वाघाची शिकार करतानाचा ग्रुप फोटो सेवेचा अभिलेख म्हणून सादर केला जातो. तसेच काही प्रकरणी भूतपूर्व संस्थानातील कर्मचा-यांची माहिती शपथ पत्राद्वारे प्रमाणित करुन निवृत्तीवेतन / कुटुंब निवृत्तीवेतन मंजूरीची विनंती करण्यात आली आहे, अशा प्रकरणी अर्जदाराने सादर केलेल्या पुराव्यावरुन / अभिलेख्यावरुन सदरहू कर्मचा-याची किमान दहा वर्षाची सेवा होते किंवा कसे याची खात्री जिल्हाधिकारी यांनी करावी. आवश्यक त्या प्रकरणी जिल्हाधिकारी यांनी महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्ती वेतन) नियम,१९८२ मधील नियम १२१ च्या तर तूदीस अधिन राहून कार्यवाही करावी.

क) वरील निर्णय या आदेशाच्या दिनांकापासून लागू राहील. उपरोक्त शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक १० जानेवार, १९९६ च्या तरतुदीनुसार ज्या प्रकरणी या पूर्वीच सेवानिवृत्तीवेतन / कुटुंब निवृत्तीवेतन मंजूर करण्यात आलेले आहे, अशा प्रकरणाचे पुनर्विलोकन करण्याची आवश्यकता नाही.

ड) हा शासन निर्णय, वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ४९६/९९/सेवा-७ दिनांक १५ जुलै, १९९९ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राच्या राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( प्र. म. देवभानकर)
उप सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,

राज्यपालांचे सचिव,
मुख्यमंत्र्यांचे सचिव,
उपमुख्यमंत्र्यांचे सचिव
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
* प्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई,
* प्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ, औरंगाबाद / नागपूर
* प्रबंधक, महाराष्ट्र प्रशासकीय न्यायाधीकरण, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व अनुज्ञेयता ), मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा व अनुज्ञेयता ), नागपूर,
महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखापरिक्षा), मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र-२ (लेखापरिक्षा), नागपूर,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यासने,
निवड नस्ती

* [illegible],